**राज्यस्तरीय उच्चाधिकार दक्षता व नियंत्रण समितीची पुनर्रचना करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः युटीए-२०२०/प्र.क्र.२५२/सामासु**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २४ जुलै, २०२३

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय क्रमांकः समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : राऊस-१०९५/प्र.क्र.९३/मावक-२, दिनांक ६ जानेवारी,१९९६
२) शासन निर्णय क्रमांकः समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : राऊस-१९९५/प्र.क्र.९३/मावक-२, दिनांक १९ नोव्हेंबर,१९९८
३) शासन निर्णय क्रमांकः समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक युटीए-२०००/प्र.क्र.१७१/मावक-२, दिनांक २१ ऑक्टोबर,२००१
४) शासन निर्णय क्रमांकः समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक युटीए-२०००/प्र.क्र.१७१/मावक-२, दिनांक २९ जुलै,२००३
५) शासन निर्णय क्रमांकः समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक युटीए-२००५/प्र.क्र.७/मावक-२, दिनांक १८ ऑक्टोबर,२००७
६) शासन निर्णय क्रमांकः समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक युटीए-२००८/प्र.क्र.२६७/सुधार-१, दिनांक २३ एप्रिल,२०१०
७) शासन निर्णय क्रमांक: सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : युटीए-२०१२/प्र.क्र.४५९/सामासु, दिनांक ७ मार्च, २०१३
८) शासन निर्णय क्रमांक: सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : पीसीआर २०१३/प्र.क्र.३७४/सामासु, दिनांक ५ डिसेंबर, २०१३
९) शासन निर्णय क्रमांक: सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : युटीए २०१४/प्र.क्र.५७४/सामासु, दिनांक ८ जानेवारी,२०१५
१०) शासन निर्णय क्रमांक: सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : संकीर्ण २०२०/प्र.क्र.०८/समन्वय, दिनांक १० जुलै, २०२०.

## शासन निर्णय-

भारत सरकारने अनुसूचित जाती, अनुसुचित जमाती (अत्याचार प्रतिबंधक) अधिनियम १९८९ भारतात सर्वत्र लागु केलेला आहे. या अधिनियमातील कलम २३ अन्वये प्राप्त अधिकारानुसार केंद्र शासनाने अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती (अत्याचार प्रतिबंधक) नियम, १९९५ राजपत्र-असाधारण,

भाग-२, खंड-३,दिनांक ३१ मार्च, १९९५ अन्वये प्रसिध्द केले आहेत. सदर नियमातील नियम १६ मधील तरतुदीप्रमाणे समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभागाचे क्रमांक राऊस-१०१५/प्र.क्र.९३/मावक-२,दिनांक ०६ जानेवारी, १९९६ अन्वये अधिनियम तथा नियमाचा अंमलबजावणीसाठी मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय उच्चाधिकार दक्षता व नियंत्रण समितीची स्थापना केली होती. त्या समितीची पुनर्रचना संदर्भाधिन क्रमांक २ ते ९ शासन परिपत्रक व शासन निर्णयाव्दारे वेळोवेळी करण्यात आलेली आहे. संदर्भाधिन क्र. १० येथील नमूद दिनांक १० जुलै, २०२० च्या शासन निर्णयान्वये, सामाजिक न्याय विभागांतर्गत विविध कायदा/अधिनियमाव्दारे स्थापित केलेले आयोग/समित्यांवर नियुक्त केलेल्या अशासकीय अध्यक्ष/सदस्य यांच्या नियुक्त्या रद्द करण्यात आल्या आहेत. त्यामुळे दिनांक ८ जानेवारी, २०१५ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या समितीची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने याबाबतचे पूर्वीचे आदेश अधिक्रमित करण्यात येत असून खाली नमूद केल्याप्रमाणे राज्यस्तरीय उच्चाधिकार दक्षता व नियंत्रण समितीचे पुनर्गठण करण्यात येत आहे.

| अ.क्र. | समिती सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | मा. मुख्यमंत्री | अध्यक्ष |
| २ | मा.उप मुख्यमंत्री, (गृह) | सदस्य |
| ३ | मा.उप मुख्यमंत्री, (वित्त) | सदस्य |
| ४ | मा.डॉ.हिना विजयकुमार गावित,लोकसभा सदस्य | सदस्य |
| ५ | मा.श्री.राजेंद्र गावित, लोकसभा सदस्य | सदस्य |
| ६ | मा.श्री.सदाशिव लोखंडे, लोकसभा सदस्य | सदस्य |
| ७ | मा.श्री.अशोक नेते, लोकसभा सदस्य | सदस्य |
| ८ | मा.डॉ.बालाजी किणीकर, विधानसभा सदस्य | सदस्य |
| ९ | मा.श्री.मंगेश कुडाळकर, विधानसभा सदस्य | सदस्य |
| १० | मा.श्री.ज्ञानराज चौगुले, विधानसभा सदस्य | सदस्य |
| ११ | मा.श्री.शांताराम मोरे, विधानसभा सदस्य | सदस्य |
| १२ | मा.श्री.श्रीनिवास वनगा, विधानसभा सदस्य | सदस्य |
| १३ | मा.श्रीमती लताबाई सोनावणे, विधानसभा सदस्य | सदस्य |
| १४ | मा.प्रा.अशोक उइके, विधानसभा सदस्य | सदस्य |
| १५ | मा.श्री.सुनिल कांबळे, विधानसभा सदस्य | सदस्य |
| १६ | मा.डॉ.देवराज होळी, विधानसभा सदस्य | सदस्य |
| १७ | मा.श्रीमती नमिता मुंदडा, विधानसभा सदस्य | सदस्य |
| १८ | मा.श्री.काशिराम पावरा, विधानसभा सदस्य | सदस्य |
| १९ | मा.श्री.नामदेव ससाणे, विधानसभा सदस्य | सदस्य |
| २० | मा. मुख्य सचिव | सदस्य |
| २१ | अपर मुख्य सचिव,गृह | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| २२ | अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| २३ | पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| २४ | संचालक/उपसंचालक,राष्ट्रीय अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती आयोग | सदस्य |
| २५ | सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | निमंत्रक |

२. या समितीची कार्ये खालील प्रमाणे राहील.

- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती (अत्याचार प्रतिबंधक) अधिनियम,१९८९ (सुधारित अधिनिमय,२०१५) व सुधारित नियम, २०१६ ची अंमलबजावणी राज्यात योग्य रितीने व काटेकोरपणे होते किंवा कसे याचा आढावा घेणे तसेच या संदर्भातील प्रकरणांचा आढावा घेणे.
- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती (अत्याचार प्रतिबंधक) अधिनियम,१९८९ (सुधारित अधिनिमय,२०१५) व सुधारित नियम, २०१६ अंतर्गत अत्याचारग्रस्त अनुसूचित जाती, अनुसूचित जमातीच्या व्यक्तींना देण्यात येणारे आर्थिक सहाय्य/मदत नियमांनुसार देण्यात येते किंवा कसे, याबाबतच्या प्रकरणांचा आढावा घेणे.
- अत्याचारग्रस्त अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व्यक्तींचे पुनर्वसन इ. नियमानुसार व तात्काळ करण्यात येत आहे किंवा कसे, या संदर्भातील प्रकरणांचा आढावा घेणे.
- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती (अत्याचार प्रतिबंधक) अधिनियम,१९८९ (सुधारित अधिनिमय,२०१५) व सुधारित नियम, २०१६ अंतर्गत पोलिसात दाखल करण्यात आलेले गुन्हे/न्यायालयात दाखल करण्यात आलेली प्रकरणे यांचा आढावा घेणे.
- या अधिनियमांची काटेकोरपणे अंमलबजावणी संबंधित संस्था/अधिकारी/ कार्यालयाकडून होते आहे किंवा कसे याचा आढावा घेणे.
- या अधिनियमांतर्गत नियमांचे उल्लंघन अथवा अंमलबजावणीसंबंधी शासनास प्राप्त होणाऱ्या विविध प्रकरणांचा आढावा घेणे.

३. अशासकीय सदस्यांना प्रवासभत्ता व दैनिक भत्ता, वित्त विभागाने त्याबाबत वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयान्वये अनुज्ञेय राहील.

४. या समितीचे संदर्भातील पुढील आदेश निर्गमित होईपर्यंत ही समिती अस्तित्वात राहील.

५. या समितीच्या एका कॅलेंडर वर्षात जानेवारी व जुलै या महिन्यांत १-१ अशा २ बैठका आयोजित कराव्यात.

६. या समितीवर नियुक्त केलेल्या लोकसभा सदस्य, विधानसभा सदस्य व विधान परिषद सदस्य यांची नियुक्ती ते लोकसभा सदस्य, विधानसभा सदस्य व विधान परिषद सदस्य असतील तोपर्यंत किंवा तत्पूर्वी त्यांचे समितीवरील नियुक्तीचे संदर्भात शासनाचे आदेश निर्गमित होईपर्यंत चालू राहील.

७. यावर होणारा खर्च **(अ)** मागणी क्र. एन-३ "२२२५,अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, (०२) जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (०२) (०३) अत्याचाराचे बळी ठरणाऱ्या अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीच्या कुटुंबातील सदस्यांना आर्थिक सहाय्य देण्याची योजना (वि.घ.यो.) (राज्य हिस्सा ५० टक्के) (२२२५ २४४२) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)"

**(ब)** मागणी क्र. एन-३ "२२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण (०२) जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (०२)(०४) अत्याचाराचे बळी ठरणाऱ्या अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीच्या कुटुंबातील सदस्यांना आर्थिक सहाय्य देण्याची योजना (केंद्र हिस्सा ५० टक्के) २२२५ २४५१) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली केलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२४१३०३२८८७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

हा शासन निर्णय मा. मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA SHIVAJI GORVE

Digitally signed by RAVINDRA SHIVAJI GORVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=1cf45fecc49d779b77cc40d48a47afd9acce3cf6f847a274fe9ee5ec9ed23094, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5BF9529B988B3F5AE0952D00630DA49F825A8ED30F32967CC2872941AFCC0742, cn=RAVINDRA SHIVAJI GORVE
Date: 2023.07.24 13:04:59 +05'30'

**( रविंद्र गोरवे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव,
मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव
मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव,
मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव,
मा. सभापती, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव,
मा. उपसभापती, महाराष्ट्र विधामंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव,
सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव,

सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व संबंधित सदस्य (डाकेने),
मा. मुख्य सचिव,यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,
सह संचालक, भारत सरकार (पीसीआर डेस्क) समाज कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली,
महालेखापाल, महाराष्ट्र -१,मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२,नागपूर,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,
सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हादंडाधिकारी,
आयुक्त, समाजकल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे,
संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण,पुणे,
सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण,
सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व जिल्ह्यांचे पोलीस अधिक्षक,
सर्व सभापती, समाजकल्याण समिती, जिल्हा परिषद,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई,
विधि व न्याय विभाग, मुंबई,
सर्व कार्यासने,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई,
निवड नस्ती, का-सामासू.